'माफ करा. काल माझ्या मुसलमान भाईनं विचारलेल्या प्रश्नाचीच पुनरावृत्ति होत आहे. पण कालपासून तोच तो प्रश्न माझ्या मनांत मळमळत आहे, म्हणून विचारण्याचा हिय्या करीत आहें. इच्छा नसल्यास आपण उत्तर देऊं नका हवं तर.' नखशिखांत इंग्रजी पोशाख केलेल्या एका हिंदी गृहस्थानं अचानकपणें बोलायला सुरवात केली होती. 'शांति-मार्गानं स्वराज्य मिळेल अशी अगदी सोळा आणे तुम्हांला खात्री वाटते का? हिंदुस्थानांत जी क्रांति केंव्हा ना केंव्हा होणार आहे ती शंभर टक्के शांतिमार्गानं, क्रांतीशी सदा संलग्न असा रक्तपात झाल्याशिवाय, होईल का?'

गफारबाबांनी हातांतलं पुस्तक खाली ठेवलं. पाय बाकावर घेऊन त्यांनी मांडी घातली. हात एकमेकावर घासायला सुरवात केली. नेहमीप्रमाणे हसले थोडेसे. पण गंभीर झाली त्यांची मुद्रा लगेच. क्षणभर एक सुरकुती येऊन गेली त्यांच्या भव्य कपाळा-वर. त्यांनी अगदी सावकाश बोलायला सुरवात केली—

'शांतिमार्गानं क्रांति घडवून आणण हा मानवी प्रयत्न आहे. सुसंकृत मानवाचं ते अत्युच्च ध्येय असावं असं माझ्यासारख्या शांतिमार्गावर संपूर्ण विश्वास असलेल्याला सदैव वाटतं. पण या मानवी प्रयत्नाला ईश्वराचं सहाय्य मिळालं पाहिजे. माझ्या मनांत जेंव्हा जेंव्हा खूप विचारांची वावटळ उठते तेंव्हा तेंव्हा असा संशय मनांत डोकावतो कीं ईश्वरी संकेत निराळा तर नसेल ना? रक्तपातमयच क्रांति कशावरून होणार नाही? मानवी प्रयत्न फोल कशावरून ठरणार नाही? विश्वाच्या मागे जी अदृश्य अशी प्रभावी शक्ति आहे तिची तर इच्छा नसेल ना रक्तपातच घडवून आणण्याची? पण माझी अंत:प्रेरणा मात्र मला सारखी